**सार्वजनिक बांधकाम विभागाची सन २०२०-२१ साठी राज्य दरसूची प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक. रादसू-२०२०/प्र.क्र.४/नियोजन-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३०/०९/२०२०

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत संपूर्ण राज्यात रस्ते, पूल, इमारतींची बांधकामे व दुरुस्तीची कामे केली जातात. त्यामुळे सर्व जिल्हयातील दरसूचीत समानता आणण्यासाठी व आवश्यक बाबींचे सुसूत्रीकरण करण्यासाठी मागील ३ वर्षापासून संपूर्ण राज्यासाठी एकच दरसूची (SSR) तयार करण्यात येत आहे. यासाठी विविध सार्वजनिक बांधकाम मंडळातील अधीक्षक अभियंत्यांची समिती तयार करण्यात येते. समितीमार्फत दरसूचीतील विविध बाबींचा, साहित्याच्या/मजूरीच्या/यंत्रसामुग्रीच्या दरांमधील वाढींचा अभ्यास करुन तसेच कंत्राटदाराच्या प्रतिनिधींच्या मागण्यांचा विचार करुन विविध बाबींचे दर ठरविण्यात येतात.

तसेच विभागात प्रगत तंत्रज्ञान अंगीकारण्यासाठी बांधकामांच्या नविन बाबींचा अभ्यास करुन त्यांचा आवश्यकतेनुसार समावेश राज्य दरसूचीत करण्यात येतो.

सार्वजनिक बांधकाम विभाग राज्यातील सर्व विभागांच्या इमारतींची बांधकामे करीत असून शासनाचे इतर विभाग तसेच स्थानिक स्वराज्य संस्था राज्य दरसूचीचा वापर करतात. ह्या सर्व बाबींवर सखोल विचार होऊन पुढील आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**आदेश:-**

१) राज्यदरसूची सन २०२०-२१ दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२० पासून लागु करण्यात येत असून ती शासनाच्या वेबसाईट www.mahapwd.com वर उपलब्ध करण्यात येत आहे. ही दरसूची संपूर्ण राज्यात सार्वजनिक बांधकाम विभागांमार्फत केल्या जाणा-या खुद्द सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच अन्य विभागांच्या कामांकरीता लागू राहील. तसेच राज्याचे इतर विभाग, महामंडळे इ. व स्थानिक स्वराज्य संस्था मार्फत करण्यात येणारी बांधकामे, देखभाल दुरुस्तीची कामे यासाठी सदर दरसुची वापरता येईल. (राज्य दरसूची सन २०१९-२० ही दिनांक ३० सप्टेंबर, २०२० पर्यंत लागू राहील.)

२) विविध जिल्हयातील विविध भौगोलिक परिस्थितीनुसार दरसूचीतील संबंधीत बाबींच्या दरात बदल करण्याचे अधिकार सर्व अधीक्षक अभियंता (सा.बां) यांना प्रदान करण्यात येत असून त्यांनी परिस्थितीचा अभ्यास करुन त्यांच्या कार्यक्षेत्रातील कामांकरीता याबाबत योग्य निर्णय घ्यावा.

३) दरसूचीच्या टिप्पणीत दिनांक १६ जुलै, २०२० रोजीचे डांबराचे व जुलै-२०२० मधील सिमेंट व स्टीलचे (GST रहीत ) तारांकीत दर (Star Rates) घेण्यात आले आहेत. तसेच स्थानिक क्षेत्रानुसार मूळ दरात करावयाची वाढ, साहित्याच्या अंतरामुळे दरांमध्ये करावयाची वाढ, अंदाजपत्रके तयार करतांना घ्यावयाची दक्षता, साहित्याची तपासणी करणे, निविदा प्रपत्रे तयार करतांना घ्यावयाची दक्षता, रोड फर्निचर इ. बाबींसाठी आवश्यक सूचना नमूद करण्यात आल्या आहेत. हया सूचनांचा अभ्यास करुन सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता यांनी बांधकामाच्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९३०१७५१२६९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJEEV ANANT RANE

Digitally signed by SANJEEV ANANT RANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=65127096b801093ad7fb61eb80e8615c3832b44354b8038dd89289e85848d9a9, postalCode=400032, street=MANTRALAYA,HUTATMA RAJGURU CHOWK,MADAM CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8ac7dcea96b950440d554df2c7f54d6021a8c9ac921a09cc853b5817534bd427, ou=PWD, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJEEV ANANT RANE
Date: 2020.10.01 12:19:28 +05'30'

**( संजीव राणे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मंत्रालयीन विभाग
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती /नागपूर
७) मुख्य अभियंता, सा.बां. प्रा.विभाग,नागपूर यांनी सादर केलेल्या राज्य दरसुचीच्या प्रस्तावात शासन स्तरावरुन केलेल्या दुरुस्तीनुसार राज्य दरसूची अद्ययावत करुन सा.बां. विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी तसेच स्वाक्षांकित छापील प्रत (Hard Copy) विहीत मुल्यासह मागणी केल्यास उपलब्ध करुन द्यावी.
८) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.) विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
९) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम मंडळे.
१०) अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
११) अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, मुंबई
१२) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पुल व इमारती), कोकण भवन, नवी मुंबई.
१३) सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग
१४) सर्व तांत्रिक अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवडनस्ती (नि-३).